अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचा पुरवठा करणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एसटीएस-२०१६/ प्र.क्र. १२५/ अजाक

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०८ मार्च,२०१७

वाचा

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-एसटीएस-२०११/ प्र.क्र.४३९/अजाक, दिनांक ६ डिसेंबर,२०१२

२) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक-डीसीटी-२३१६/ प्र.क्र.१३३/ का-१४१७, दि.५ डिसेंबर,२०१६

३) आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे पत्र क्रमांक-सकआ/अजाउयो-१/ मिनी ट्रॅक्टर/ प्र.क्र.१६९/ २०१६/२०१६-१७/ का-१४/०६, दि. ०४ जानेवारी,२०१७

## शासन निर्णय

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना रु. ३.५० लाखाच्या कमाल मर्यादेत (९० टक्के शासकीय अनुदान व १० टक्के स्वयंसहाय्यता बचत गटाचा हिस्सा) ९ ते १८ अश्वशक्तीचा मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने (कल्टिव्हेटर किंवा रोटॅव्हेटर व ट्रेलर) यांचा पुरवठा करण्याची योजना उपरोक्त अ.क. (१) येथील शासन निर्णयान्वये मंजूर केली आहे. नियोजन विभागाच्या वरील संदर्भ क्रमांक (२) येथील शासन निर्णयान्वये विविध कल्याणकारी योजनांमध्ये वस्तू स्वरुपात मिळणाऱ्या लाभांचे हस्तांतरण रोख स्वरुपात लाभार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे संबंधित वस्तुबाबत वितरण योजना सादर करणे आवश्यक आहे. त्यानुसार आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी वरील संदर्भ क्रमांक (३) अन्वये अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना ९ ते १८ अश्वशक्तीचा मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने (कल्टिव्हेटर किंवा रोटॅव्हेटर व ट्रेलर) यांचा पुरवठा करण्याच्या अनुषंगाने वितरण योजना सादर केली असून, आयुक्त,समाज कल्याण,पुणे यांनी सादर केलेल्या योजनेनुसार अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने (कल्टिव्हेटर किंवा रोटॅव्हेटर व ट्रेलर) यांचा पूरवठा करण्यासाठी लाभाचे हस्तांतर रोख स्वरुपात थेट लाभार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्याच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे योजना तयार करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे:-

१. **संबंधित वस्तुबाबत वितरण योजना तयार करणे.**

अ) या योजनेअंतर्गत अनुसुचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना रु. ३.५० लाख या मर्यादेत (९० टक्के शासकीय अनुदान व १० टक्के स्वयंसहाय्यता बचत गटांचा हिस्सा) किमान ९ ते १८ अश्वशक्तीचा मिनी ट्रॅक्टर/ ट्रॅक्टर व त्याची उपसाधने (कल्टीव्हेटर किंवा रोटॅव्हेटर व ट्रेलर) खरेदी करण्यासाठी अर्थसहाय्य करण्यात येईल.

आ) लाभार्थी स्वयंसहाय्यता बचत गटांना अनुज्ञेय असणाऱ्या किमान ९ ते १८ अश्वशक्तीपेक्षा जादा अश्वशक्तीचा ट्रॅक्टर व त्याची उपसाधने खरेदी करता येतील मात्र त्याची किंमत कमाल शासकीय अनुदानापेक्षा (रु.३.१५ लाख) जास्त असल्यास कमाल अनुज्ञेय अनुदानाव्यतरिक्त जादाची रक्कम बचत गटांनी स्वत: खर्च करावी लागेल.

इ) मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांची कमाल किंमत रूपये ३.५० लाख राहील. त्यामध्ये ९० टक्के म्हणजेच रु. ३.१५ लाख शासकीय अनुदान व स्वयंसहाय्यता बचत गटाचा हिस्सा १० टक्के म्हणजेच रु. ३५,०००/- इतका असेल.

ई) या योजनेतंर्गत लाभार्थी बचत गटाची निवड झाल्यानंतर बचत गटाने Ministry of Agriculture and Farmers Welfare Department of Agriculture, Co-operation and Farmers Welfare यांनी निर्धारित केलेल्या प्रमाणकानुसार (specification) मान्याताप्राप्त उत्पादकांकडून मिनी ट्रॅक्टर/ ट्रॅक्टर व त्याची उपसाधने शासनाने निर्धारित केलेल्या किंमतीपर्यंत खरेदी करावीत.

उ) स्वयंसहाय्यता बचत गटाने मिनी ट्रॅक्टर/ट्रॅक्टर व उपसाधने खरेदी केल्याची पावती सादर केल्यानंतर व खातर जमा करून लाभार्थी बचत गटाला शासकीय अनुदानाचा ५० टक्के हप्ता त्यांच्या बचत गटाच्या आधार संलग्न खात्यावर जमा करण्यात येईल. उर्वरित ५० टक्के अनुदान मिनी ट्रॅक्टर/ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांची आरटीओ कार्यालयाकडे नोंद झाल्यानंतर बचत गटाच्या बँक खात्यावर जमा करण्यात येईल किंवा स्वयंसहाय्यता बचत गटाने मिनी ट्रॅक्टर/ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांची आरटीओ कार्यालयाकडे नोंद केल्याचे पुरावे सादर केल्यास १०० टक्के अनुदान स्वयंसहाय्यता बचत गटाच्या बॅंक खात्यात जमा करण्यात यावे.

२. **वस्तु विकत घेण्यासाठी अनुदान ठरविणे**.

याबाबत शासनाने शासन पत्र क्रमांक एसटीएस-२०११/प्र.क्र.४३९/अजाक-१, दिनांक ६ डिसेंबर, २०१२ अन्वये निर्धारित केल्याप्रमाणे ९ ते १८ अश्वशक्तीच्या मिनी ट्रॅक्टर व त्याच्या उपसाधनांची (कल्टिव्हेटर किंवा रोटॅव्हेटर व ट्रेलर) याची कमाल किंमत ३.५० लाख ठरविण्यात आलेली आहे.त्याप्रमाणे अनुदानाची रक्कम कमाल किंमतीच्या ९० टक्के (३.१५ लक्ष) राहिल.

३. **वितरित करावयाच्या वस्तुंचे परिमाण (specification) ठरविणे**.

भारत सरकारचे Ministry of Agriculture and Farmers Welfare Department of Agriculture, Co-operation and Farmers Welfare यांनी निर्धारित केल्यानुसार मिनी ट्रॅक्टर/ ट्रॅक्टर व त्याची उपसाधने ही फार्म मशिनरी, ट्रेनिंग आणि टेस्टींग इन्स्टिटयूट यांनी टेस्ट करून जाहिर केलेल्या उत्पादकांच्या यादीतील परिमाणानुसार (Specification) असावित.

४. **या योजनांतर्गत पात्रतेचे निकष**.

याबाबत शासन निर्णय क्रमांक एसटीएस-२०११/प्र.क्र.४३९/अजाक-१, दिनांक ६ डिसेंबर, २०१२ अन्वये लाभार्थीचे पात्रतेचे निकष ठरविण्यात आले आहेत. यामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा प्रस्तावित करण्यात येत आहे :-

१) अनुसुचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटातील सदस्य हे महाराष्ट्र राज्याचे रहिवाशी असावेत.

२) स्वयंसहाय्यता बचत गटातील किमान ८० टक्के सदस्य हे अनुसुचित जाती व नवबौध्द घटकांतील असावेत.

३) स्वयंसहाय्यता बचत गटाचे अध्यक्ष व सचिव अनुसूचित जाती वा नवबौध्द घटकांतील असावेत.

४) मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांच्या खरेदीची कमाल मर्यादा रू. ३.५० लाख इतकी राहील. स्वयंसहाय्यता बचत गटांनी वरील कमाल मर्यादेच्या रक्कमेच्या किंवा प्रत्यक्ष साधनांच्या किंमतीच्या १० टक्के स्वहिस्सा भरल्यानंतर प्रत्यक्ष किंमतीच्या ९० टक्के (कमाल रू. ३.१५ लाख) शासकीय अनुदान अनुज्ञेय राहील.

५) लाभार्थी स्वयंसहाय्यता बचत गटांनी या योजनेतंर्गत अनुज्ञेय असलेल्या किमान ९ ते १८ अश्वशक्तीपेक्षा जादा अशशक्तीचा ट्रॅक्टर व त्याची उपसाधने खरेदी करता येईल मात्र त्याची या योजनेतंर्गत अनुज्ञेय असलेल्या अनुदाना (रु. ३.१५ लाख) पेक्षा जास्तची रक्कम संबंधित बचत गटाने स्वत: खर्च करावी.

६) स्वयंसहाय्यता बचत गटाने राष्ट्रीयकृत बँकेत बचत गटाच्या नावे बँक खाते उघडावे व सदरचे बँक खाते बचत गटाचे अध्यक्ष व सचिव यांचे आधार क्रमांकाशी संलग्न करावे.

७) संबंधित जिल्हयातील सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण हे जिल्हयातील इच्छुक स्वयंसहाय्यता बचत गटांकडून जाहिरातींद्वारे अर्ज मागवतील. उपलब्ध तरतुदीच्या अनुषंगाने अर्जदारांची संख्या जास्त असल्यास सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, यांनी पारदर्शक पध्दतीने (लॉटरी पध्दत) लाभार्थ्यांची निवड करावी. निवड करण्यात आलेल्या स्वयंसहाय्यता बचत गटांची नावे व पत्ते जिल्हा कार्यालयाच्या फलकांवरती लावण्यात यावीत व त्याची प्रत आयुक्त समाज कल्याण महाराष्ट्र राज्य पुणे यांचेकडे सादर करण्यात यावी.

८) निवड झालेल्या बचत गटाला निवड झाल्याचे लेखी कळविण्यात येईल. ज्या स्वयंसहाय्यतांना बचत गटांची निवड करण्यात आलेली आहे त्यांनी सदरहू यंत्र चालविण्याचे अधिकृत संस्थेकडून प्रशिक्षण घेणे व त्याचे प्रमाणपत्र सादर करावे लागेल.

९) निवड झालेल्या बचत गटांनी वर नमूद केलेल्या कार्यपध्दतीतील अनुक्रमांक १ (उ) नुसार कार्यवाही झाल्यानंतर संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त सदरचे अनुदान बचत गटाच्या बँक खात्यामध्ये जमा करतील. तसेच सहाय्यक आयुक्त समाज कल्याण हे मूळ पावती (ओरीजनल रिसिट) आयुक्त समाज कल्याण/शासनाला सादर करतील.

१०) बचत गटाने खरेदी केलेल्या मिनी ट्रॅक्टरच्या / ट्रॅक्टरच्यादर्शनी भागावर महाराष्ट्र शासन, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनुसुचित जाती उपयोजनेंतर्गत अर्थसहाय्य असे ठळकपणे लिहिण्यात यावे.

११) प्रत्येक जिल्हयामध्ये किती स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचे वाटप करावे याबाबत शासनाकडून स्वतंत्ररित्या कळविण्यात येईल.

१२) या योजनेंतर्गत स्वयंसहाय्यता बचत गटांना त्यांचे आर्थिक उत्पन्न वाढावे या हेतूने त्यांना देण्यात आलेला मिनी ट्रॅक्टर/ट्रॅक्टर व त्याची उपसाधने इतर शेतक-यांना भाडेतत्वावर देऊ शकेल मात्र कोणत्याही परिस्थितीत त्याला मिनी ट्रॅक्टर/ ट्रॅक्टर व त्याची उपसाधने विकता येणार नाही अथवा सावकार किंवा अन्य व्यक्तीकडे गहाण ठेवता येणार नाही. लाभार्थ्यांने मिनी ट्रॅक्टर/ ट्रॅक्टर विकल्यास किंवा गहाण ठेवल्यास सदर व्यवहार बेकायदेशीर ठरवून स्वयंसहाय्यता बचत गटांवर फौजदारी गुन्हा दाखल करण्यात येईल. तसेच संबंधित स्वयंसहाय्यता बचत गटांकडून शासनाने मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांच्या खरेदीसाठी खर्च केलेली संपूर्ण रक्कम वसूल करण्यात येईल आणि संबंधित स्वयंसहाय्यता बचत गटांना शासनाच्या अन्य योजनांचे लाभ घेण्यास किमान ५ वर्षे अपात्र ठरविले जाईल. तशा आशयाचे हमी पत्र स्वयंसहाय्यता बचत गटांकडून घेण्यात यावे.

१३) ज्या स्वयंसहाय्यता बचत गटांना या योजनेंतर्गत मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचे वाटप करण्यात आले आहे. अशा स्वयंसहाय्यता बचत गटांनी किमान १० वर्षे तो मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने उपयोगात आणावेत या हेतूने मिनी ट्रॅक्टर/ट्रॅक्टर व त्याची उपसाधने मिळाल्यापासून किमान १० वर्षापर्यंत स्वत:हून दरवर्षी १० मे पूर्वी संबंधित सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांना नोंदणीकृत डाकेने पत्र पाठवून त्याला देण्यात आलेला मिनी ट्रॅक्टर/ ट्रॅक्टर व त्याची उपसाधने विकला नसल्याचे किंवा गहाण ठेवला नसल्याचे प्रमाणपत्र सादर करावे.

१४) ज्या लाभार्थ्यांना पावर ट्रिलरचा लाभ दिला आहे त्या लाभार्थ्यांना या योजनेचा पुन्हा लाभ घेता येणार नाही.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०९११४६५०८१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2017.03.09 11:47:14 +05'30'

**(भा. र. गावित)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सह आयुक्त, समाज कल्याण (अनुसूचित जाती उपयोजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. सह सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई
४. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण (सर्व)
७. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (सर्व)
८. जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९. मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११. महालेखालपाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/पूणे
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. लेखा व कोषागरे संचालनालय, संगणक शाखा, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
१५. निवड नस्ती, अजाक.